**बीड जिल्ह्यातील परळी येथे सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याच्या कामास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-१७१८/प्र.क्र.४९/पोल-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक: ३० ऑक्टोबर, २०१८

**वाचा :**

१ गृह विभाग, शासन निर्णय क्र. सीसीटी-३६१५/ प्र.क्र.३६/ पोल-३, दि.०९ जानेवारी, २०१७.
२ पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचा क्र.पोमसं/१७/६१६२/सीसीटीव्ही परळी बीड/१७/२०१८, दि.०६.०४.२०१८ चा प्रस्ताव.
३ पोलीस अधीक्षक, बीड यांचे जा.क्र. प्रबंधक/बीड जिल्हा/माहिती/२०१८/१०१, दि.२२.०८.२०१८ चे पत्र.
४ गृह विभाग, शासनाचे समक्रमांकाचे क्र. सीसीटी-१७१८/ प्र.क्र.४९/ पोल-३, दि.१६ ऑगस्ट, २०१८ चे पत्र.
५ गृह विभाग, शासनाचे समक्रमांकाचे क्र. सीसीटी-१७१८/ प्र.क्र.४ ९/ पोल-३, दि. ८ ऑक्टोबर, २०१८ चे पत्र
६ पोलीस अधिक्षक,बीड यांचे जा.क्र.प्रबंधक/सीसीटीव्ही परळी/२०१८/१४३४४, दि. ०९ ऑक्टोबर, २०१८ चे पत्र

**प्रस्तावना :**

बीड जिल्ह्यातील परळी शहरात महत्त्वाची पर्यटन स्थळे, धार्मिक स्थळे, गर्दीची ठिकाणे, प्रमुख बाजारपेठ, महत्त्वाच्या बँक आस्थापना, शहरातील प्रवेश मार्ग व निर्गमन मार्ग व अन्य महत्त्वाच्या मर्म स्थळांच्या ठिकाणी कायदा व सुव्यवस्थेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याकरीता जिल्हा नियोजन समिती, बीड मार्फत नाविन्यपुर्ण योजनेंतर्गत १.२५ कोटींचा निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. गृह विभाग शासन निर्णय दि.०९.०१.२०१७ नुसार प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे

**शासन निर्णय** :

बीड जिल्ह्यातील परळी शहरात महत्त्वाची पर्यटन स्थळे, धार्मिक स्थळे, गर्दीची ठिकाणे, प्रमुख बाजारपेठ, महत्त्वाच्या बँक आस्थापना, शहरातील प्रवेश मार्ग व निर्गमन मार्ग व अन्य महत्त्वाच्या मर्म स्थळांच्या ठिकाणी कायदा व सुव्यवस्थेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याकरीता रु.१.२५ कोटी खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) बीड जिल्ह्यतील परळी शहरात महत्त्वाच्या ठिकाणी सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी येणारा खर्च जिल्हा नियोजन समिती, बीड यांनी नाविन्यपुर्ण योजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या रु.१.२५ कोटी इतक्या निधीतून करण्यात यावा.

३) सदरचा प्रकल्प राबविण्याबाबतची पुढील कार्यवाही गृह विभाग, शासन निर्णय दि.०९.०१.२०१७ मधील परिशिष्ट क्र. १, २ व ३ मध्ये नमूद मार्गदर्शक तत्त्वे व संदर्भधीन पत्र क्र.४ व ५ मध्ये माहिती व तंत्रज्ञान विभागाने कळविलेल्या सुचनांचा समावेश RFP मध्ये केल्यानंतरच पुढील कार्यवाही पोलीस अधीक्षक, बीड यांनी करावी.

४) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०३०१२२५५३८४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.10.30 12:31:50 +05'30'

**( दिनेश आ.सस्ते )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव.
३) मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, औरंगाबाद.
९) जिल्हाधिकारी, बीड.
१०) पोलीस अधीक्षक, बीड.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
१३) जिल्हा नियोजन अधिकारी,बीड.
१४) निवडनस्ती, पोल-३.